येवला जि.नाशिक येथील १०० खाटांच्या श्रेणीवर्धीत उपजिल्हा रुग्णालयातील नवनिर्मित २० अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः अपदे- २०२३ /प्र.क्र.१२३/आरोग्य-३
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग,मुंबई-४०० ००१.
दिनांक : २४ मे, २०२३.

वाचा -

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक:अपदे- २०२२/प्र.क्र.६७/आरोग्य-३, दिनांक- ३०.०३.२०२२.
२) आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे कार्यालय, पुणे यांचे पत्र क्रमांक-संसंआसे/उसआसे नाशिक /अस्थायी पदे २०/कक्ष ५२ब/न.क्र.६०४/२३, दिनांक-१७.०४.२०२३.
३) अपर मुख्य सचिव (ले.व को.)यांचे अर्धशासकिय पत्र वित्त विभाग क्र.आकृबं-२०२३/प्र.क्र.१८/आपुक, दि.२८ मार्च,२०२३.

**शासन निर्णय-**

उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक यांच्या अधिपत्याखालील येवला जि.नाशिक येथील ३० खाटांवरुन १०० खाटांमध्ये श्रेणीवर्धीत उपजिल्हा रुग्णालयासाठी २० नियमित पदांच्या निर्मितीस मान्यता देण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये सदर अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये येवला जि.नाशिक येथील श्रेणीवर्धीत १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयातील सदर नवनिर्मित २० नियमित अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२२ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०२३-२०२४ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक-आर-१**

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०६ - सार्वजनिक आरोग्य

००१ - संचालन व प्रशासन

(०१)(०९) - महाराष्ट्र आरोग्य सेवा विकास प्रकल्पांतर्गत ग्रामिण/कुटीर रुग्णालयांचे उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन (२२०१ ४६२४)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दिनांक-१८.०८.२०२२ व दि.०८.०२.२०२३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. वित्त विभागाच्या दि.०८.०२.२०२३ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ मुदतवाढीस मान्यता देण्यात आली असली तरी, दरम्यानच्या काळात सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याबाबत सर्व प्रशासकिय विभागांनी दक्षता घेण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे. तसेच संदर्भ क्र.०३ अन्वये वित्त विभागाच्या अर्धशासकिय पत्रानुसार अस्थायी पदांना दि.३१.०८.२०२३ पर्यंत अंतिम मुदतवाढ देण्यात आली असून त्यादरम्यान सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याकरीता सुधारीत आकृतीबंधाचे प्रस्ताव शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २९ जून,२०१७ नुसार तपासून व त्यानुसार कार्यवाही करुन वित्त विभागास सादर करण्याकरीता आयुक्तालय कार्यालयाकडून उचित कार्यवाही करावी व त्याबाबातचा प्रस्ताव शासनास पाठवावा. तसेच यानंतर कोणत्याही परिस्थितीत सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याकरीता मुदतवाढ दिली जाणार नाही, याबाबतची कृपया नोंद घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१८१५४७०५३११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.05.24 11:45:24 +05'30'

**(अशोक आत्राम)**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक,आरोग्य सेवा, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, (राज्यस्तर) मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा (आरोग्य) पुणे.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, नाशिक.
८. वैद्यकीय अधिक्षक, उपजिल्हा रुग्णालय, येवला जि.नाशिक
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
१०. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
१२. निवडनस्ती (आरोग्य-३)

शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक-अपदे-२०२३ /प्र.क्र.१२३/ आरोग्य-३,
दिनांक - २४ मे, २०२३ सोबतचे विवरणपत्र.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | | अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|
| १ | वैद्यकीय अधिकारी (शस्त्रक्रिया) | एस-२० | ५६१००-१७७५०० | १ |
| २ | वैद्यकीय अधिकारी (स्त्रीरोग प्रसुती तज्ञ) | एस-२० | १७७५००-५६१०० | १ |
| ३ | बधिरीकरण शास्त्रज्ञ | एस-२० | १७७५००-५६१०० | २ |
| ४ | वैद्यकीय अधिकारी (भिषक) | एस-२० | १७७५००-५६१०० | १ |
| ५ | वैद्यकीय अधिकारी (बालरोग) | एस-२० | १७७५००-५६१०० | १ |
| ६ | वैद्यकीय अधिकारी (अस्थिव्यंग) | एस-२० | १७७५००-५६१०० | १ |
| ७ | वैद्यकीय अधिकारी (नेत्रशल्यचिकित्सा) | एस-२० | १७७५००-५६१०० | १ |
| ८ | वैद्यकीय अधिकारी (दंत चिकित्सा) | एस-२० | १७७५००-५६१०० | १ |
| ९ | वैद्यकीय अधिकारी (अपघात कक्ष) | एस-२० | १७७५००-५६१०० | १ |
| १० | वैद्यकीय अधिकारी | एस-१५ | ४१८००-१३२३०० | १ |
| ११ | सहाय्यक अधिसेविका | एस-१५ | ४१८००-१३२३०० | १ |
| १२ | परिसेविका | एस-१४ | ३८६००-१२२८०० | ५ |
| १३ | प्रशासकीय अधिकारी | एस-१५ | ४१८००-१३२३०० | १ |
| १४ | कार्यालयीन अधिक्षक | एस-१४ | ३८६००-१२२८०० | १ |
| १५ | वरिष्ठ लिपिक | एस-८ | २५५००-८११०० | १ |
| | **एकूण** | | | **२०** |